# लिओनार्दो दा विंची

लेखिका: सुसिय हॉज



# लिओनार्दो

# दा विंची



मराठी अनुवादः सुशील मेन्सन

# तत्कालिन परिस्थिती

15 व्या शतकातील प्रकाशयुग हा इटलीत शिकण्याचा, रचनात्मक अभिव्यक्तिचा आणि नवनिर्मितीचा काळ होता. या काळात तिथे कला, काव्य, मुद्रण, गणित, विज्ञान तत्सम क्षेत्रांमध्ये अनेक सुधारणा घडून आल्या. *लिओनार्दो दा विंची* हा एक चित्रकार, खगोलतज्ज्ञ, शिल्पकार, भूगर्भशास्त्रज्ञ, गणितज्ज्ञ, वनस्पतीशास्त्रज्ञ, पशु वैज्ञानिक, शोधनिर्माता, अभियंता, वास्तुविशारद आणि संगीतकार होता. आपल्या प्रदीर्घ कारकिर्दीत लिओनार्दोने राजा, पोप आणि सरदारांसोबत काम केले. त्याने फ्लोरेन्स, मिलान, मांटुआ, रोम, व्हेनिस, पाविया, बोलोग्ना आणि फ्रान्स येथे प्रवास केला आणि कामही केले. त्याने केवळ मोनालिसाचेच चित्र रंगवले नाही तर हेलिकॉप्टर, यांत्रिक माग, कार, बाईक आणि अनेक नळ्या असलेली बंदूक यांचे आराखडेदेखील तयार केले.

DUCHY OF SAVOY

FRANCE



15 व्या शतकात इटली अनेक छोट्या छोट्या स्वतंत्र राज्यांमध्ये विभागलेला होता. या प्रत्येक राज्याचा स्वतंत्र राजा होता. आपले बळ वाढवण्यासाठी ते एकमेकांत तसेच शेजारच्या लहान राज्यांशी युद्धे करत.




REPUBLIC OF VENICE

Venice

DUCHY OF FERRARA

Bologna

REPUBLIC OF GENOA

Lucca

Florence

Pisa

Vinci

REPUBLIC OF FLORENCE

PAPAL STATES

Adriatic Sea

REPUBLIC OF SIENA

CORSICA (Rep. of Genoa)

ROME

ITALY

Tyrrhenian Sea

KINGDOM OF NAPLES

SARDINIA



Vinci, Leonardo's birth place

# एक तरूण कलाकार

लिओनार्दोचा जन्म एप्रिल 1452 मध्ये इटलीतील टस्कनीच्या ग्रामीण भागात *विंची* या शहरानजिक झाला. त्याची आई, *कॅटेरिना*, एका शेतकरी कुटुंबात वाढली. त्याचे वडील, *सेर पियेरो*, बऱ्यापैकी धनिक असलेल्या कुटुंबात वाढले. त्यांनी लग्न केले नाही, पण त्यांना त्यांच्या या मुलाचा अभिमान वाटत असे. कॅटेरिनाने लिओनार्दोला सुरुवातीपासून आपल्याकडेच ठेवले. सेर पियेरो बऱ्याचदा त्यांना भेटायला येत असे.






लिओनार्दो दोन वर्षांचा असताना, त्याचे वडील त्याला आपल्या गावी घेऊन गेले. तिथे त्याची आपल्या आजोबांशी आणि काकांशी चांगलीच गट्टी जमली. काही काळानंतर, सेर पियरोने फ्लोरेन्सच्या एका श्रीमंत तरुणीशी लग्न केले.



लिओनार्दो आणि त्याच्या वडिलांचा भाऊ *फ्रान्सेस्को*, यांच्यात खूप जवळीक होती. लिओनार्दो नेहमी त्याच्या मागेमागे फिरत असे आणि त्याला अनेक प्रश्न विचारत असे. फ्रान्सेस्को त्याच्या प्रश्नांची उत्तरे द्यायचा प्रयत्न करत असे.




लिओनार्दोला अनेक विषयांमध्ये रस होता.




वस्तुस्थिती: *प्रकाशयुग* हा इतिहासातील असा काळ होता ज्यामध्ये युरोपीय विद्वानांना प्राचीन ग्रीस आणि रोम यांच्या नवनव्या विचारांनी प्रेरणा दिली.

फ्लोरेन्स एक रोमांचक स्थान होते. तिथे नवनव्या इमारती बनत होत्या. युरोपातील सर्वोत्कृष्ट कलाकार तिथे राहात असत.






लिओनार्दो चार वर्षांचा असताना, सेर पियेरो त्याला सुप्रसिद्ध कलाकार *अँड्रे डेल वेरोकचिओ* याच्या कार्यशाळेत घेऊन गेले. .



लिओनार्दोने फ्लोरेन्समध्ये वेरोकचिओचा शिष्य म्हणून काम करण्यास सुरुवात केली.



कार्यशाळेकडे चित्रे, मूर्त्या, अलंकार, दागिने, चिलखत आणि आणखी बऱ्याच वस्तुंची मागणी येत असे.

तिथे लिओनार्दो चित्र काढायला, रंगवायला, कांस्य शिल्प बनवायला, दागिने घडवायला, संगीत वाजवायला असं बरंच काही शिकला.



पंधराव्या शतकात, फ्लोरेन्स चैतन्याने सळसळतं शहर होतं. विद्वान, तत्वज्ञ आणि कलाकारांचा तो कट्टाच होता. तिथे सर्व प्रकारच्या कार्यशाळा होत्या. तिथे लोक संगीत वाजवत आणि रस्त्यांवर फेरफटका मारत.













बऱ्याचदा अनेक कलाकार कार्यशाळेत येत आणि आपल्या कल्पनांवर वेरोकचिओशी चर्चा करत.




जेव्हा वेरोकचिओकडे एखादी मोठी कला वस्तू येई, तेव्हा सर्व शिष्य त्यावर काम करत.




**वस्तुस्थिती**

मध्यकाळात, विविध व्यवसायातील लोक व्यापारी संघटना वा समूह बनवू लागले. ते आपल्या व्यवसायाचे नियम बनवत आणि आपल्या सेवांची किंमत ठरवत.

लिओनार्दो नेहमी विज्ञान, गणित आणि तत्वज्ञानाच्या शिक्षकांशी चर्चा करत असे.

आपल्या शरीरात आजार कसे शिरतात?

किती हे प्रश्न! आपल्याकडे सगळ्या प्रश्नांची उत्तरं नाहीत. पण कदाचित एक दिवस तू ती शोधून काढशील.

एकदा लिओनार्दो आणि आणखी दोन शिष्य *बोटीसेली* आणि *क्रेडी* हे *ख्रिस्ताचा बाप्तिस्मा* हे चित्र रंगवण्यास वेरोकचिओला मदत करत होते.

चुका सुधारतोय, गुरुजी. संपलंच माझं.

लिओनार्दो, हे कधीतरी होणार हे माहीत होतं मला. तुझ्याइतक्या उंचीला मी कधीच पोहोचू शकणार नाही. आजपासून मी माझ्या पेंटब्रशला स्पर्श करणार नाही.



त्यावेळी फ्लोरेन्समध्ये प्रोत्साहन मिळायचं. धनिक व्यापारी आणि बँकवाले नवनव्या इमारती उभारण्यासाठी वास्तुविशारदांना भरपूर पैसा देत. लिओनार्दोला ज्ञानाची आस होती. त्याच्यासाठी हे शहर अगदी सुयोग्य होते.



1472 साली, तो शिल्पतज्ज्ञ बनला. त्याने गुरुजी म्हणवण्याचा अधिकार मिळवला.

आता श्रीमंत लोक त्याला काम देऊ लागले आणि पैसासुद्धा!



गुरुजी बनल्यावर 1476 साली लिओनार्दोने स्वत:ची कार्यशाळा सुरू केली. पण 1477 पर्यंत त्याने वेरोकचिओसोबत काम सुरू ठेवले. लिओनार्दोची चित्रे, मूर्त्या आणि धातुकाम पाहून लोक अवाक होत. लोकांनी यापूर्वी असे वास्तववादी आणि जिवंत काम पाहिले नव्हते. फावल्या वेळांत, लिओनार्दो चित्रे काढत असे. याप्रकारची चित्रे आधी कुणी कुठे पाहिली नव्हती.





लिओनार्दो त्याच्या स्वत:च्या कार्यशाळेत काम करू लागला. अनेक शिष्य त्याला कामात मदत करत आणि त्याच्याकडून प्रशिक्षण घेत.



कधीकधी लिओनार्दोची चित्रे इतकी वास्तववादी वाटत की लोक ती खरीखुरी समजत.







प्रतिष्ठित मेडिसी कुटुंबाने त्याला आपल्या शानदार घरी बोलावले.

**वस्तुस्थिती**

मेडिसी कुटुंब हे धनिक व्यापारी आणि बँकवाले होते. त्यांनी 1434 ते 1737 या काळात फ्लोरेन्सवर राज्य केले. त्यांनीच कला, वास्तुविशारद शास्त्र, संगीत आणि शिष्यवृत्ती यांना प्रोत्साहन दिले.

# अनेक प्रतिभांचा धनी

लिओनार्दोची फ्लोरेन्समधील कार्यशाळा यशस्वीरित्या सुरू होती. 1482 साली तो प्रबळ सरदार *लुडोव्हिको सफोर्झा* यांना भेटण्यास मिलान येथे गेला.







लिओनार्दोने आपल्या श्रीमंत मालकाला प्रभावित करण्यासाठी चांदीचे वाद्यही बनवले.



लुडोव्हिको हे कास्टेलो सफोर्झेस्को नावाच्या एका भल्यामोठ्या किल्ल्यात राहात. आपल्या पुतण्याच्या मृत्युनंतर त्यांनी मिलानवर राज्य केले.












कित्येक आठवडे गेले, महिने सरले. लिओनार्दोने लुडोव्हिकोसाठी अनेक शस्त्रे, इमारती, पूल आणि अनेक वस्तुंचे आराखडे बनवले.

लिओनार्दोने तिथे चिलखती रणगाड्याचा आराखडा बनवला.



त्याने अनेक नळ्या असलेल्या बंदुकीचा आराखडाही बनवला.



लिओनार्दोने त्याच्या चित्रात छाया दाखवणारी तंत्रेही विकसित केली.






लिओनार्दोला फ्रेडी भावंडांसोबत राहाण्यास जागा मिळाली. तेसुद्धा कलाकार होते.



सरदार लुडोव्हिकोसोबत काम करतानाही लिओनार्दोने आपले शोधकार्य बंद केले नाही. त्याला युद्धाचा तिरस्कार होता तरीही जीवघेणी शस्त्रे बनवून तो चांगला पैसा कमवत होता.









जग केवळ बारकाईने अभ्यास करून आणि त्याबाबत मनन-चिंतन करूनच शिकता येईल. लिओनार्दोच्या सगळ्या रेखाचित्रांमधून हेच दिसून येते.



लिओनार्दोला सौंदर्याची मोहिनी पडे. पण त्याने अनेक मजेदार आणि विचित्र चेहरे असलेली चित्रेही रंगवली.



लिओनार्दोने मिलानमध्ये आणखी एक कार्यशाळा सुरू केली. त्याचं नाव होतं – *अ‍ॅकेडेमिया लिओनार्दी विंची.*



लिओनार्दो कामात खूप व्यग्र असे. त्याचे पाच शिष्य होते. त्याच्या स्टुडिओत येणाऱ्या लोकांना तो आवडीने विनोद आणि गोष्टी सांगत असे.




**वस्तुस्थिती**

प्रकाशयुग काळात कलाकारांनी सपाट चित्रे तीन मितीत दाखवण्याचे एक तंत्र शोधले. लिओनार्दोने आपली चित्रे, रेखाचित्रे आणि आराखडे यांमध्ये हे तंत्र वापरले. यालाच *सरळ रेषीय दृष्टीकोन* म्हणतात.

एकदा सरदार सफोर्झा यांनी लिओनार्दोवर एक मोठे काम सोपवले. त्यानुसार, 80 टन कांस्य वापरून लिओनार्दोला एक भव्य पुतळा घडवायचा होता.



हे कांस्य स्मारक लुडोव्हिकोचे वडील *फ्रान्सेस्को सफोर्झा* यांच्यासाठी होते. लिओनार्दोने घोड्याची आणि स्मारकाची अनेक चित्रे रेखाटली. या पूर्वतयारीसाठी त्याला सुमारे दहा वर्षे लागली!

असा दिसेल आपला कांस्याचा पुतळा, सरदार. पुढचे पाय उचललेला घोडा, 23 फूट उंच.

आवडलं मला हे!

लिओनार्दो आपला पुतळा पूर्ण करण्याआधीच फ्रेंच सैनिक इटलीवर चाल करून आले.




फ्रेंचांनी पुतळ्याच्या कांस्याचा वापर तोफा बनवण्यासाठी केला. त्यांनी दा विंचीच्या मातीच्या घोड्याची प्रतिकृती नेमबाजीच्या सरावासाठी वापरली.

# संशोधक आणि गणितज्ज्ञ

लिओनार्दोला अफाट जिज्ञासा होती. मानवी शरीर काम कसे करते, हे अभ्यासण्यासाठी त्याने प्रेतांची चिरफाड केली.




आपल्या अभ्यासातून त्याने शरीराबद्दल कित्येक नव्या गोष्टी शिकल्या, ज्या पूर्वी कुणाला ठाऊक नव्हत्या.





तो शस्त्रक्रियाही पाहात असे. इतिहासात प्रथमच मानवी शरीर हे गंभीर वैज्ञानिक संशोधनाचे उद्दिष्ट बनले.



हॉस्पीटलमध्ये काम करणाऱ्या एका व्यक्तिच्या मदतीने लिओनार्दोने आपल्या स्टुडिओत मेलेल्या माणसांच्या प्रेतांची तपासणी केली.



लुडोव्हिकोच्या अनेक प्रकल्पांनी लिओनार्दोला व्यस्त ठेवले. लुडोव्हिकोच्या पुतणीच्या लग्नाच्या सन्मानार्थ होणाऱ्या *स्वर्गाची मेजवानी* या नाटकाचा रंगमंचही त्यानेच तयार केला.



**वस्तुस्थिती**

डॉक्टरांना नुकतेच उमगले होते की शरीर काम कसे करते, हे समजण्यासाठी शरीराच्या आतच डोकावून पाहिले पाहिजे.

लिओनार्दोने गणितज्ज्ञ *लुका पॅसिओली*शी मैत्री केली. तो एक फ्रान्सिसन पाद्री होता. पॅसिओलीने लिओनार्दोला गणिताबद्दल शिकवले. त्या मोबदल्यात, लिओनार्दोने पॅसिओलीच्या *प्रमाण* या विषयाच्या पुस्तकाची चित्रे काढून दिली.






1495 साली, लिओनार्दोला *द लास्ट सपर* हे चित्र काढण्यास सांगण्यात आले. प्रेषित *येशू* आणि *अनुयायी* यांचा अंतर्भाव असलेल्या या विशाल भित्तीचित्राला मिलानच्या एका मठात काढायचे होते.



मी एका नव्या तंत्राचा शोध लावलाय. या तंत्राने मी भिंतीवर थेट ब्रशने रंगवू शकतो. यात रंगही गडद दिसतात. 33 फूट लांब चित्र बनवायला मी गणिताचा वापर केलाय. मी गद्दार *जुडास*ला इतर सर्व शिष्यांसोबत दाखवून जुनी परंपरा मोडीत काढलीय. चित्र चांगलं बनतंय, पण त्याचा मोबदला देणारे भिक्षु नाराज आहेत, कारण चित्र बनायला फार वेळ लागतोय.



1499 साली, फ्रेंचांनी मिलानवर कब्जा केला तेव्हा लिओनार्दोने पॅसिओली, सलाई आणि इतर शिष्यांसोबत शहर सोडले. या महान कलाकारासाठी काळ वेगाने बदलत होता.

# युद्ध आणि पाणी

लिओनार्दो, पॅसिओली, सलाई आणि इतर शिष्य आधी मांटुआला गेले. नंतर ते व्हेनिसला गेले.




लिओनार्दोवर उड्डाणगतीची मोहिनी पडली. पक्षी हवेत कसे तरंगतात, जमिनीवर कसे उतरतात, त्यांचे पंख कसे बनले आहेत यांवर त्याने संशोधन केले. त्यावरून त्याने एक उडणारे यंत्र बनवले. त्याने एका किल्ल्याचा आराखडाही बनवला.






लिओनार्दोच्या प्रतिभेने स्थानिक लोक प्रभावित झाले. लवकरच त्याने युद्धप्रयत्नाला मदत करण्याचे काम शोधले. या कामात त्याला चांगले यश मिळाले.




व्हेनिसवर ओट्टोमान साम्राज्याकडून आक्रमणाची शक्यता होती. लिओनार्दो तिथे गेला तेव्हा ओट्टोमानची लढाऊ जहाजे आक्रमण करण्यासाठी किनाऱ्यावर उभी होती.



**वस्तुस्थिती**

ओट्टोमान साम्राज्य सध्याच्या तुर्कस्थानमध्ये होते. ओट्टोमान सुलतानांनी अनेक ख्रिस्ती देशांवर कब्जा मिळवला होता. आता त्यांना व्हेनिसवर कब्जा मिळवायचा होता.

लिओनार्दोने ऑट्टोमानांचा हल्ला निष्फळ करण्यासाठी अनेक योजना आखल्या.




काही महिन्यांनंतर, लिओनार्दो आणि त्याचे मित्र फ्लोरेन्सला परतले. त्याने वडिलांसोबत काही काळ घालवला. त्याचे वडील तिथे आपल्या चौथ्या पत्नीसोबत राहात होते.




मग लिओनार्दोने पाणबुडी, पाणबुड्यांचे कपडे आणि श्वासोच्छवास साधन यांचे आराखडे बनवले. यामुळे सैनिकांना पाण्याखाली वावरणे शक्य होऊ लागले.




लिओनार्दो परतल्यामुळे फ्लोरेन्सचे लोक आनंदीत झाले. 1502 साली, चलाख हुकूमशहा आणि लष्करी शासक *सिझर बोर्गिया* त्याला भेटायला आला.



लिओनार्दो सिझरसमवेत इटलीभर फिरला. त्याने शहर आणि त्यातील इमारती यांचे आराखडे कसे बनवले होते, याचा अभ्यास केला.

लिओनार्दो, तू वेळोवेळी मला आणि इतर अनेकांना सल्ले दिलेयस. आता तू पीसाला हरवण्यासाठी फ्लोरेन्सला मदत कर. तू एकमेव व्यक्ती आहेस, जी हे काम करू शकते.

किल्ला उभारण्याची ही पद्धत छान आहे, सीझर. पण मी यापेक्षा चांगले किल्ले उभारू शकतो.

पीसाच्या लोकांना समुद्रात जाण्यापासून रोखण्यासाठी आपल्याला *अर्नो* नदीचा प्रवाह बदलला पाहिजे. हाच एक कालवा आहे जो फ्लोरेन्सच्या लोकांना समुद्रापर्यंत पोहोचण्यास मदत करेल.

विलक्षण!



लिओनार्दो फ्लोरेन्सचे दुसरे चॅन्सेलर *निकोलो मॅकियावेली* यांना भेटले. मॅकियावेली आणि लिओनार्दो एकमेकांच्या बुद्धिमत्तेचा आदर करत. लवकरच ते चांगले मित्र बनले. त्यांनी लिओनार्दोच्या काही शोधांवर आणि कल्पनांवर काम केले.

तुला भेटून बरं वाटलं, लिओनार्दो.

सुप्रसिद्ध लोकप्रिय लेखक आणि तत्वज्ञ निकोलो मॅकियावेली यांना भेटून खूप आनंद झाला.



## नकाशे आणि मोना लिसा

होकायंत्र आणि आपले गणिताचे ज्ञान या बळावर लिओनार्दोने अनेक ठिकाणांचे नकाशे बनवले. अचूक नकाशे बनवणाऱ्या पहिल्यावहिल्या लोकांमध्ये त्याची गणना होते.



लिओनार्दो हा फ्लोरेन्समधील धनिकांसाठी सुंदर सुंदर चित्रे काढण्यासाठी प्रसिद्ध होता.





1503 साली, फ्लोरेन्सने *मायकेल एंजेलो* आणि दा विंची या दोघांना *पलाझो व्हेचिया* येथे एका लढाईचे चित्र चितारण्यास बोलावले. काम सुरू असताना, ते आणि त्यांचे शिष्य नेहमी एकमेकांत अंतर ठेवून असत.

1502 च्या सुमारास, एका व्यक्तिने लिओनार्दोला आपली पत्नी लिसाचे चित्र काढण्यास सांगितले.

















मायकेल एंजेलो, राफेल आणि लिओनार्दो एकमेकांच्या कामांची स्तुती करत, पण एकमेकांबद्दल मत्सरही बाळगत.



1504 साली, लिओनार्दोच्या वडिलांचे निधन झाले.




लिओनार्दोचे काका फ्रान्सेस्कोने आपल्या मृत्युपत्रात आपली संपत्ती लिओनार्दोच्या नावे केली.






1507 साली, लिओनार्दो, फ्रान्सचा राजा, *लुई बारावा,* याच्या दरबारचा चित्रकार बनला. राजा लुईंचे वास्तव्य त्यावेळी मिलानमध्ये असे.








सलाई आणि एक नवा शिष्य *मेझी* यांनी लुईच्या शाही दरबार कामात लिओनार्दोला मदत केली.

कलाकाराकडे निरीक्षण करून चित्राच्या माध्यमातून सत्याची अभिव्यक्ती करण्याची ताकद असते.



फावल्या वेळात लिओनार्दो शरीरचनेचा अभ्यास करत असे आणि आपल्या वहीत त्याच्या नोंदी करत असे.




**वस्तुस्थिती**

लिओनार्दोने उडणाऱ्या यंत्राचे अनेक आराखडे बनवले. पण हे यंत्र बनवण्यासाठी लागणारे सामान 500 वर्षांनंतर उपलब्ध झाले. त्याचे आराखडे आधुनिक ग्लायडर, हेलिकॉप्टर आणि पॅराशूट यांच्याशी साधर्म्य दाखवतात.

## रोम आणि फ्रान्स

1513 साली, लुडोव्हिकोच्या मुलाने फ्रेंचांना मिलानबाहेर हाकलून दिले. पुन्हा एकदा लिओनार्दो आश्रयदात्यांना पारखा झाला. आता फ्लोरेन्सवर मेडिसी कुटुंबाचे राज्य नव्हते. त्यामुळे लिओनार्दो रोमला गेला. तिथे मेडिसींचे चांगले वजन होते.




पोप लिओ दहावा हे मेडिसी होते.








लिओनार्दो पोप लिओसाठी काम करत होता. मायकेल एंजेलो आणि राफेल हे तरूण कलाकार माजी पोपसाठी काम करत असत. आता तेसुद्धा पोप लिओसाठी काम करू लागले.




दरम्यान, लिओनार्दो अजूनही शरीर कसे काम करते, हे पाहाण्यासाठी शरीराचा बारकाईने अभ्यास करत होता.



एकदा पोप लिओने लिओनार्दोला धार्मिक चित्र बनवण्यास सांगितले.



लिओनार्दो अजूनही प्रेतांचा अभ्यास करण्याचा धोका पत्करत होता. एकदा त्याचे हे कृत्य लोकांना कळले. मग लोकांनी त्याच्यावर, तो चेटूक करतो, असा आरोप ठेवला.




यापूर्वी तो फ्रान्सचा राजा *फ्रान्सेस्को*ला भेटला होता आणि दोघांनी एकमेकांची स्तुतीही केली होती. मग नव्या आश्रयदात्याच्या शोधात लिओनार्दो फ्रान्सच्या दरबारात गेला.






1516 साली, लिओनार्दोने फ्रेंच राजाचे निमंत्रण स्वीकारले. तो राजाचा प्रमुख चित्रकार, वास्तुविशारदतज्ज्ञ आणि तंत्रज्ञ बनला. त्यावेळी लिओनार्दोचे वय 64 वर्षे होते.



फ्रान्सच्या शाही दरबारात लिओनार्दोचे दिवस आनंदात जाऊ लागले. त्याची वही कल्पना, योजना आणि आराखडे यांनी भरून गेली.




लिओनार्दोने मृत्युपत्रात संपत्ती आणि जमीन सलाई, सावत्र भाऊ, नोकर यांच्यात वाटली. पुस्तके, लेख आणि चित्रे त्याने मेजीला दिली. 2 मे 1519 रोजी, त्याचे फ्रान्सचा राजा *फ्रँकॉइस* या मित्राच्या बाहुपाशात निधन झाले.



समाप्त